**मोटार वाहने अधिनियम, १९८८ च्या**
**<u>कलम १२९ च्या अंमलबजावणीबाबत</u>**

**<u>महाराष्ट्र शासन.</u>**
**गृह विभाग.**
परिपत्रक क्र. एमव्हीए ०५८८/सीआर ५७०/७६४-अ(१)/परि. २,
मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२, दिनांक :- २४ मार्च, २००५.

# <u>परिपत्रक</u>

**वाचा:-** १) शासन अधिसुचना क्र. एमव्हीए ०५८८/सीआर ५७०/(७६४)/परि. २, दिनांक ०१.१०.२००१.
२) शासन अधिसुचना क्र. एमव्हीए ०५८८/७६४-अ/प्र.क्र. ५७०/परि. २, दिनांक ०१.१०.२००१.
३) शासन अधिसुचना क्र. एमव्हीए ०५८८/सीआर ५७०/७६४-अ/परि. २, दिनांक १४.८.२००३.
४) शासन अधिसुचना क्र. एमव्हीए ०५८८/सीआर ५७०/७६४-अ/परि. २, दिनांक २०.०८.२००३.
५) शासन अधिसुचना क्र. एमव्हीए ०५८८/सीआर ५७०/७६४-अ/परि. २, दिनांक १७.०१.२००५.
६) शासन परिपत्रक, क्र. एमव्हीए ०५८८/सीआर ५७०/७६४-अ(१)/परि. २, दिनांक १७ जानेवारी, २००५.
७) शासन अधिसुचना क्र. एमव्हीए ०५८८/सीआर ५७०/७६४-अ/परि. २, दिनांक २४ मार्च, २००५.

मोटार वाहने अधिनियम, १९८८ च्या कलम १२९ मधिल तरतुदी पुढीलप्रमाणे आहेत:-

**"कलम १२९ :- संरक्षक शिरोवेष्टन वापरणे**

मोटार सायकल चालविणाऱ्या किंवा तिच्यावरुन प्रवास करणाऱ्या (साईडकारखेरीज कोणत्याही वर्गाच्या किंवा वर्णनाच्या मोटार सायकलवरुन) प्रत्येक व्यक्तीने सार्वजनिक ठिकाणी असतांना भारतीय मानक विभागाच्या मानकांशी अनुरुप असे संरक्षक शिरोवेष्टन वापरले पाहिजे."

२. या अनुषंगाने महाराष्ट्र मोटार वाहने नियम, १९८९ चे कलम २५० मध्ये शासनाने उपरोक्त क्रमांक १, दिनांक ०१.१०.२००१ च्या अधिसुचनेन्वये बदल केलेला होता आणि त्याच अनुषंगाने उपरोक्त क्रमांक ४, दिनांक २०.०८.२००३ च्या अधिसुचनेन्वये "राष्ट्रीय महामार्ग व राज्य महामार्ग सोडून अशा महामार्गाच्या महानगरपालिका व नगरपरिषद यांच्या हद्दीतून जाणाऱ्या भागात" मोटार वाहने अधिनियम, १९८८ च्या कलम १२९ मधिल तरतुदी लागू होणार नाहीत, असे ठरविले होते.

३. मा. उच्च न्यायालयाच्या निदेशाप्रमाणे शासनाने उपरोक्त क्रमांक ५, दिनांक १७.०१.२००५ च्या अधिसुचनेन्वये दिनांक २०.०८.२००३ ची अधिसुचना विखंडीत केली होती आणि मोटार वाहने अधिनियम, १९८८ च्या कलम १२९ मधील तरतुदी संपूर्ण राज्यासाठी लागू केलेल्या होत्या. मोटार वाहने अधिनियम, १९८८ च्या कलम १२९ मधील तरतुदींची कडकपणे अंमलबजावणी करण्यात यावी असे निदेश शासनाने उपरोक्त क्रमांक ६ च्या दिनांक १७.०१.२००५ च्या परिपत्रकान्वये सर्वसंबंधीत अंमलबजावणी यंत्रणांना दिलेले होते.

४. तथापि, या तरतुदींची अंमलबजावणी करतांना क्षेत्रिय स्तरावर ज्या अडचणी आलेल्या आहेत (हेल्मेट पुरेशा प्रमाणात उपलब्ध नसणे, हेल्मेटची कमतरता भासल्यामुळे त्यांच्या किंमती भडकणे, भारतीय मानक विभागाच्या मानकांशी अनुरुप हेल्मेटची उपलब्धता नसणे इत्यादी) त्या विचारात घेता, शासनाने या तरतुदीची अंमलबजावणी करण्यासाठी मा.उच्च न्यायालयाकडे मुदतवाढ मागितलेली होती. मा.उच्च न्यायालयाने त्यांच्या समोरील जनहित याचिका क्र. ८६/२००३ मध्ये याप्रकरणी सर्व बाबी विचारात घेऊन दिनांक १ एप्रिल, २००५ पासून चार टप्प्यांमध्ये संपूर्ण राज्यात हेल्मेटची सक्ती करण्यात यावी असे आदेश दि.०३.०३.२००५ रोजी दिलेले आहेत.

५. मा.उच्च न्यायालयाच्या या निर्देशाच्या अनुषंगाने शासनाने दिनांक २४ मार्च, २००५ रोजी अधिसूचना निर्गमित केली असून, त्यात नमुद केल्याप्रमाणे महाराष्ट्र मोटार वाहने नियम, १९८८ च्या कलम १२९ मधील तरतुदींची अंमलबजावणी आता संपूर्ण राज्यात पुढीलप्रमाणे करण्यात यावी असे स्पष्ट केलेले आहे :-

| <u>दिनांक</u> | <u>अंमलबजावणी करण्यात यावयाचे क्षेत्र (जिल्हे)</u> |
|---|---|
| ०१.०४.२००५ | मुंबई (शहरे), मुंबई (उपनगरे), ठाणे |
| ०१.०५.२००५ | रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग, अहमदनगर, जालना, परभणी, हिंगोली, बीड, अकोला, वाशिम, उस्मानाबाद, बुलढाणा, गडचिरोली, सांगली, सातारा, जळगांव, लातूर, नांदेड, यवतमाळ, वर्धा, चंद्रपूर, गोंदिया, भंडारा, नाशिक |
| ०१.०६.२००५ | कोल्हापूर, सोलापुर, औरंगाबाद, अमरावती, नागपूर |
| ०१.०७.२००५ | पुणे, धुळे, नंदुरबार |

६. आता, या परिपत्रकाद्वारे असे स्पष्ट करण्यात येत आहे की, <u>मोटार वाहने अधिनियम, १९८८ च्या कलम १२९ मधिल तरतुदी उपरोक्त परिच्छेद ५ मध्ये नमुद केल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्याच्या संपूर्ण क्षेत्राला एकूण चार टप्प्यामध्ये लागू झालेल्या आहेत. त्या अनुषंगाने असेही स्पष्ट करण्यात येत आहे की, महाराष्ट्र राज्यात मोटार सायकल चालविणाऱ्या किंवा तिच्यावरुन प्रवास करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने वर नमुद केल्याप्रमाणे सार्वजनिक ठिकाणी असतांना संरक्षक शिरोवेष्टन वापरणे बंधनकारक आहे.</u>

७. सर्व अंमलबजावणी यंत्रणांना या परिपत्रकाद्वारे पुन्हा असे कळविण्यात येत आहे की, **<u>मोटार वाहने अधिनियम, १९८८ च्या कलम १२९ मधिल तरतुदीची आता महाराष्ट्र</u>**

राज्याच्या संपूर्ण क्षेत्रात उपरोक्त परिच्छेद ५ मध्ये नमुद केल्याप्रमाणे एकूण चार टप्प्यात काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यांत यावी. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी यासंदर्भात या तरतुदींना दूरदर्शन / वर्तमानपत्रे / जाहिरातीचे फलक याद्वारे यथायोग्य प्रसिध्दी देऊन याबाबत केलेल्या अंमलबजावणीचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रमेश शिंदे )
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

*प्रत,*

- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- सर्व विभागीय आयुक्त
- परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- सर्व जिल्हादंडाधिकारी
- सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक
- अपर पोलीस महासंचालक ( वाहतूक ), महाराष्ट्र राज्य, मुंबई
- प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
- सर्व पोलीस आयुक्त
- अपर पोलीस आयुक्त ( वाहतूक ), मुंबई
- सर्व पोलीस अधिक्षक
- सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी
- सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी
- उप संचालक ( वृत्त ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
- कार्यासन अधिकारी ( पोल-८ ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

सर्व अंमलबजावणी यंत्रणांना विनंती करण्यात येते की, सदरहु अधिसूचना व परिपत्रक जनतेच्या माहितीसाठी त्याच्या कार्यालयातील सुचनाफलकावर प्रदर्शित करावे तसेच योग्य त्या माध्यमाद्वारे या तरतुदींची प्रसिध्दी करावी.

उप संचालक ( वृत्त ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांना विनंती की, त्यांनी सदरच्या अधिसुचनेला व परिपत्रकाला यथायोग्य प्रसिध्दी द्यावी.

..................०..................